# जोन ऑफ आर्क



# जोन ऑफ आर्क

जोन ऑफ आर्क ही धार्मिक आचार-विचारांची ग्रामीण मुलगी होती. बालपणापासूनच तिने शेतात परिश्रम केले. इंग्रज सैनिक तिला चेटकीण समजून घाबरत. फ्रेंच सैनिक तिला ईश्वराचा दूत समजत व तिचे आदेश पाळत. फ्रेंच दरबारी व धर्मोपदेशक मात्र तिचा द्वेष करत. त्यांनी केलेल्या विश्वासघातामुळेच तिचा मृत्यू झाला. काहीही झालं तरी, तिने फ्रान्सचे रक्षण केले, हे विसरता येणे शक्य नाही.



# जोन ऑफ आर्क

इंग्लंडचा सम्राट राजा हेन्री पंचम याने 1415 मध्ये फ्रान्समधील अजिनकोर्ट या ठिकाणी झालेल्या लढाईत फ्रेंचांवर विजय मिळवला. असेच अनेक विजय मिळवून इंग्लंडने फ्रान्सच्या एका मोठ्या भागावर स्वामित्व मिळवले. हेन्रीने फ्रेंच राजाच्या मुलीशी लग्न केले होते. त्याला फ्रेंच गादीचा वारस म्हणून घोषीत केले होते.

पण हेन्री वयाच्या पस्तिसाव्या वर्षी मरण पावला. त्याचा मुलगा आपल्या वडिलांसारखा लढवय्या नव्हता. खरंतर, इंग्रज सैन्याकडे उत्तर फ्रान्सचा भूभाग आपल्या ताब्यात ठेवण्याचे सामर्थ्य होते. पण हेन्रीनंतर पुढच्या तीसच वर्षांत जिंकलेला सर्व भूभाग इंग्रजांनी गमावला.

हे घडले, फ्रान्सच्या लोरेन प्रदेशातील डोमरेमी गावातील एका शेतकऱ्याच्या मुलीमुळे. जोन नावाची ही मुलगी इतिहासात जोन ऑफ आर्क म्हणून ओळखली जाते.

तत्कालिन फ्रान्स कसा होता, याची कल्पना करणे तसे कठीण आहे. तिथे कुणीही सुरक्षित नव्हते. दोन्ही बाजुंचे सैनिक गाव आणि शेते उजाड करत भटकत असत. जोन राहात होती ते डोमरेमी गावसुद्धा याला अपवाद नव्हते. तेथील गुरेढोरेसुद्धा धोक्याची सूचना देणाऱ्या घंटेचा आवाज ओळखून सुरक्षित जागी आसरा घेत असत.



बालपणी जोन इतर मुलांसारखीच होती. सगळी मुले जे खेळ खेळत तेच खेळ जोनसुद्धा खेळत असे. ती डोमरेमी गावाभोवतालच्या शेतांतून व जंगलातून भटकत असे. ती वडिलांच्या शेतावर काम करत असे, मेंढ्या राखत असे आणि हिवाळ्यात संध्याकाळी विणकाम व सूतकाम शिकत असे.

जोन एक शांत व धार्मिक प्रवृत्तीची मुलगी होती. आईवडिलांसोबत चर्चमध्ये जाण्यास तिला आवडत असे. कधीकधी गावातील मुले हसण्या-खेळण्यात दंग असत तेव्हा जोन चर्चमध्ये एकटीच शांतपणे बसत असे. मुलांना तिचे हे वागणे विचित्र वाटे. पण जोन कणखर व निरोगी मुलगी होती. तिला मनापासून आवडत असलेली गोष्ट ती करायची.

जोनचा मृत्यू झाल्यावर तीस वर्षांनंतर गावातील जुने-जाणते लोक जोनबद्दल काय म्हणाले, याची लिखित नोंद आहे. अर्थात, ही नोंद फ्रेंच भाषेत आहे. नोंदीत म्हटले आहे:

“गावातील सर्वांनाच जोन आवडायची. ती खूप नम्र, साधी आणि धार्मिक प्रवृत्तीची होती. चर्चमध्ये तसेच इतर काही पवित्र ठिकाणी जायला तिला आवडायचं. ती शेतात काम करायची, फावड्याने खणायची, घरासाठी आवश्यक जबाबदारी उचलायची.”



जोनला ओळखणाऱ्या डोमरेमीच्या लोकांनी कधी कल्पनाही केली नसेल की ही शांत छोटी मुलगी अठरा वर्षांची होईपर्यंत फ्रान्समध्ये जन्मलेली सर्वात प्रसिद्ध स्त्री बनेल.

जोनला चर्चमधील घंटेचा आवाज ऐकायला खूप आवडत असे. एके दिवशी वडिलांच्या बागेत बसलेली असताना तिला घंटेचा आवाज ऐकू आला. कुणीतरी या आवाजाद्वारे आपल्याशी बोलत आहे, असा तिला भास झाला. ती तेव्हा फक्त तेरा वर्षांची होती. असा अनुभव आल्यामुळे, “मी खूप घाबरले,” असे ती नंतर म्हणाली.

पण घंटेचा आवाज मैत्रीपूर्ण व दयाळू होता. हा आवाज तिला नेहमी चांगली मुलगी बनण्यास व चर्चमध्ये जाण्यास सांगत असे. जोनला कसलीही महत्त्वाकांक्षा नव्हती. ती स्वेच्छेने चर्चमध्ये जात असे. त्यामुळे घंटेचा आवाज काही वेगळे सांगत नव्हता.

पण लवकरच जोनला आवाजासोबतच विचित्र दृश्येही दिसू लागली. सुरुवातीला ही दृश्ये अस्पष्ट होती पण नंतर जोन घरच्या लोकांना म्हणाली, “मी तुम्हाला जितक्या स्पष्टपणे बघते तितक्याच स्पष्टपणे ही दृश्ये बघू शकते. दृश्ये गायब झाल्यावर मी खूप रडत बसते, खूप दु:खी होते.” हळूहळू या आवाजाशी जोनचे घनिष्ट नाते तयार झाले. एवढे की, घंटा वाजवणाऱ्या माणसाला ती भेटवस्तू देऊ लागली.



जोन सोळा वर्षांची झाली तेव्हा तिला सेंट मायकेल आणि लोरेनचे दोन संत, सेंट कॅथरीन व सेंट मार्गारेट, यांच्या स्पष्ट आकृत्या दिसू लागल्या.

त्यांनी डोमरेमीच्या शेतकऱ्याच्या या मुलीसाठी एक नवा संदेश आणला होता. जोनने फ्रान्सच्या सैन्याचे नेतृत्व करावे, इंग्रजांना समुद्रात हाकलून देऊन फ्रान्सला मुक्त करावे आणि तरुण राजा चार्ल्स सातवा याचा रिम्स येथे राज्याभिषेक करावा, असे त्या आकृत्यांनी जोनला सांगितले.

फ्रेंच सैन्याला प्रत्येक ठिकाणी इंग्रजांकडून हार पत्करावी लागली होती. फ्रेंच लोक पूर्णतः निराश झाले होते. त्यांच्या शेतात पीके पडून राहिली होती वा सडली होती. लोकांचा सारा व्यापार-उदीम थंडावला होता.

एक सामान्य ग्रामीण मुलगी हजारो क्षुब्ध इंग्रज सैनिकांना विरोध करू शकेल, हे अशक्यप्राय वाटत होते. इंग्रज सैनिकांनी देशभर दहशत निर्माण केली होती. त्यामुळे सुरुवातीला जोनने आकृत्यांच्या संदेशावर विश्वास ठेवण्यास नकार दिला. पण त्याच काळात एक दंतकथा पसरली की लोरेन सीमेवरील एक तरुणी फ्रान्सला मुक्त करेल. कदाचित जोनने ही दंतकथा ऐकली असावी आणि घंटेचा आवाज ऐकून तिला ती तरुणी आपणच आहोत, असे वाटू लागले असावे.



ऑर्लीयन्स शहराला दहा हजार इंग्रज सैनिकांनी घेराव घातला होता. इंग्रजांनी ऑर्लीयन्स जिंकले तर फ्रान्सच्या दक्षिण भागावर विजय मिळवण्याचा रस्ता त्यांना मोकळा झाला असता.

जोनला ऐकू येणारे आवाज तिला इंग्रजांना हाकलून ऑर्लीयन्स शहर मुक्त करण्यास सांगत होते.

सुरुवातीला ती गोंधळली आणि दु:खी झाली. तिचे वडील डोमरेमी गावातील एक प्रमुख व्यक्ती होते. जोनने आपल्या वडिलांकडे आपले मन मोकळे केले. जोन फक्त सोळा वर्षांची होता. एखाद्या ग्रामीण मुलीमध्ये असलेले शहाणपण तिच्यात होते. पण तिच्या वडिलांसाठी ती अजूनही लहान मूलच होती. साहजिकच, जोनचे म्हणणे त्यांनी हसण्यावारी नेले व असा काही मूर्खपणा न करण्यास निक्षून सांगितले.

जोन पुन्हा मेंढ्या राखण्यास व शेतात काम करण्यास निघून गेली. पण तिला सतत ऐकू येणारे आवाज काहीतरी करण्याची गळ घालू लागले. ती पुन्हा वडिलांकडे गेली. यावेळी मात्र त्यांच्या रागाचा पारा चढला. “असा काही वेडेपणा करण्यास परवानगी देण्यापेक्षा मी तुला स्वत:च्या हातांनी समुद्रात बुडवून टाकणे पसंत करेन,” असे त्यांनी म्हटले. अर्थात, त्यांनी असे काही केले नाही. पण त्यांची मुलगी जे काही करायला बघत होती तो निव्वळ मूर्खपणा व खुळचटपणा होता, असे त्यांना ठामपणे वाटत होते.



जोन खूप धार्मिक प्रवृत्तीची होती. ईश्वर आपल्याशी संवाद साधतो, अशी तिची ठाम श्रद्धा होती. ईश्वराची आज्ञा मोडू नये, एवढीच तिची इच्छा होती.

डोमरेमीपासून सुमारे दहा-बारा मैलांवर असलेल्या व्हॉकुलर्स या तटबंदीयुक्त शहराचा ताबा त्यावेळी रॉबर्ट बॉड्रीकोर्ट या सरदाराकडे होता. जोनने त्याच्याकडे जाऊन मदत घ्यायचे ठरवले. आपले वडील याला परवानगी देणार नाहीत, हे तिला कळून चुकले होते. मग ती प्रथम व्हॉकुलर्सजवळ असलेल्या गावात आपल्या आईच्या नातलगाकडे राहायला गेली.

जोनने आपल्या नातलगाला तिला ऐकू येणाऱ्या आवाजाबद्दल सांगितले. नातलग याबाबतत साशंक होता, पण जोन ठाम व आग्रही होती. शेवटी, नातलगाने तिला बॉड्रीकोर्टकडे घेऊन जायचे मान्य केले.

रॉबर्ट बॉड्रीकोर्टने जोनला सरळ धुडकावून लावले. लोकरीचे फाटके लाल कपडे घातलेली ही शेतकऱ्याची सामान्य मुलगी तिला ईश्वराने फ्रान्सला मुक्त करण्याचा आदेश दिला आहे असे सांगते, याचा बॉड्रीकोर्टला मोठा अचंबा वाटला. “तिचे कान बंद करून घरी परत पाठवून द्या,” त्याने लक्झार्ट नावाच्या अधिकाऱ्याला सांगितले. पण जोनवर याचा काही परिणाम झाला नाही. फ्रेंच सैनिक इंग्रजांकडून सगळ्या ठिकाणी हरत होते. काहीतरी करणे भाग होते. मग बॉड्रीकोर्टला वाटू लागले की कदाचित जोनला वाटणारी श्रद्धा काही अनपेक्षित बदल घडवू शकेल.



त्याकाळातील लोक अंधश्रद्धाळू होते. ते चेटकीण व स्वर्गातून येणाऱ्या संकेतांवर विश्वास ठेवत. रॉबर्ट डी बॉड्रीकोर्टने विचार केला की जोनला ईश्वराने आपल्या मदतीसाठी पाठवलंय, यावर फ्रेंच सैनिकांचा विश्वास बसला तर त्यांची हिंमत वाढेल.

फ्रेंचांनी नुकतेच एक युद्ध हरले होते. ऑर्लीयन्स शहराबाहेर असलेल्या इंग्रजांच्या छावणीत हेरिंग नावाच्या माशाचा मोठा साठा जात होता. फ्रेंच सैनिकांनी त्याला रोखण्याचा प्रयत्न केला. पण त्यात ते अयशस्वी ठरले. शहराच्या आत असलेल्या फ्रेंच छावणीतील अन्नाचा साठा संपला होता. त्यामुळे तसेही ते आत्मसमर्पण करण्याच्या तयारीत होते. अशा परिस्थितीत रॉबर्ट डी बॉड्रीकोर्टला जोन ही आशेचा एक शेवटचा किरण वाटली.

चार्ल्स सातवा त्यावेळी व्हॉकुलर्स शहरापासून तीनशे मैलांवर असलेल्या चिनॉन शहरात होता. तिथे पोहोचण्यासाठी जोन इंग्रजांच्या ताब्यात असलेल्या भागातून प्रवास करणार होती. तिथे बर्गंडी प्रदेशातील सैनिक तैनात होते. पण ते आता इंग्रजांच्या बाजूने लढणार होते. जोनसाठी हा प्रवास खूप धोकादायक होता.

जोन घोड्यावर स्वार होऊन दोन तरूण फ्रेंच सरदारांसोबत निघाली. तिला ऐकू येणाऱ्या आवाजांनी तिला पुरुषांसारखे कपडे घालण्यास सांगितले होते. त्यामुळे तिने तिचे केस कापून छोटे केले व एक गडद रंगाचा जाड कोट अंगात घातला. रॉबर्ट डी बॉड्रीकोर्टने तिला एक तलवार दिली आणि म्हटले, “जा आणि जे शक्य होईल ते कर.” रॉबर्टचे हे वाक्य फार उत्साहवर्धक नव्हते.



दिवस हिवाळ्याचे होते. इंग्रज सैनिकांच्या नजरेस पडून नये यासाठी तिघांनी पायवाटेसारख्या आडमार्गांने प्रवास केला. त्यांना दोन मोठ्या नद्याही पार कराव्या लागल्या. कारण पुलावर इंग्रज सैनिकांचा पहारा होता.

या प्रवासाला अकरा दिवस लागले. रात्री ते नेहमी खुल्या आभाळाखाली घालवत. कारण कुणाच्या घरी निवाऱ्यासाठी राहाणे धोक्याचे होते. थकल्या-भागल्या अवस्थेत ते चिनॉन शहरात आले. राजाला भेटणे सहजसोपे नाही, हे तिथे पोहोचल्यावर त्यांच्या लक्षात आले.

जोन ऑफ आर्कचे आगमन झाले त्या काळात चिनॉन शहर जसे होते त्यात आजपर्यंत फारसा बदल झालेला नाही. तेथील जुनी घरे, चढ-उतार असलेले वेडवाकडे रस्ते पाचशे वर्षांपूर्वी जोनच्या काळात जसे होते तसेच आजही आहेत.

तेथील राजवाडा लाऊआर नदीची उपनदी असलेल्या व्हिएन नदीच्या किनाऱ्यावर एका उंच कड्यावर उभा आहे. आज तो केवळ अवशेष रुपात उरला आहे. दोनशे वर्षांपूर्वी याच राजवाड्यात इंग्रज राजा रिचर्ड कोअर डी लायन याचा दरबार भरत असे. राजवाड्याच्या अवशेषामध्ये एका खोलीच्या भिंतीवरील दगडावर काही कोरीवकाम केलेले दिसते. त्यावरून याच खोलीमध्ये जोन ऑफ आर्क आणि डॉफिन (चार्ल्स सातवा) यांची भेट झाल्याचे समजते.



चार्ल्सचे शरीर व मन थकले होते. तो पूर्णपणे आपल्या सल्लागारांच्या मदतीवर अवलंबून होता. सल्लागारांनी सुरुवातीला चार्ल्स व जोनच्या भेटीला परवानगी दिली नाही. पण लोकांनी जोनच्या मोहिमेबद्दल बरेच ऐकले होते. त्यामुळे परवानगी नाकारली तर त्याचे गंभीर परिणाम होतील, याचे सल्लागारांना भयही होते.

त्यांच्यापैकी कुणीही जोनच्या आतील आवाजावर विश्वास ठेवला नाही. जोनला खोटे ठरवण्यासाठी त्यांनी चार्ल्सला एका साध्या दरबाऱ्याच्या वेषात दरबारात आणले व दुसऱ्या एका तरुणाला सिंहासनावर बसवले. जर जोनला ऐकू येणारे ईश्वरी आवाज खरे असतील तर ती खऱ्या चार्ल्सला निश्चितच ओळखू शकेल, असे सल्लागारांचे म्हणणे होते.

जोन दीर्घ प्रवासाने थकली होती. दरबारात ती आपल्या जाड कोटातील वेषातच हजर झाली. तिथे उंची कपडे घातलेल्या स्त्रियांना पाहून ती चकीत झाली. दरबारी तिला पाहून हसू लागले. जोनचे पितळ आता उघडे पडणार, असे त्यांना वाटू लागले.

तिथे उपस्थित असलेल्या लोकांनुसार, शेतकऱ्याच्या या मुलीने सिंहासनावर बसलेल्या तरुणाकडे पाहून स्मित केले व आपली मान हलवली. मग वळनू ती थेट दरबाऱ्याच्या वेषातील चार्ल्सकडे गेली आणि गुडघ्यावर बसून बोलली, “मी ईश्वराची दूत आहे. मी तुम्हाला सांगायला आले आहे की तुम्हीच फ्रान्सचे खरे राजा आहात.”



चार्ल्सची खात्री पटली की जोनला आपल्या राज्याचे रक्षण करण्यासाठीच ईश्वराने पाठवले आहे. पण त्याच्या सल्लागारांना अद्याप शंका होती. त्यांनी चर्चचे विद्वान व धर्मोपदेशक यांच्यातर्फे जोनची विधाने पडताळून पाहाण्याची मागणी केली.

जोनला आपल्याला होणाऱ्या विरोधामुळे काही कळेनासे झाले. आपल्याला विचारण्यात आलेल्या प्रश्नांची आपण सामान्य शेतकऱ्याच्या मुलीसारखं प्रामाणिकपणे साधीसरळ उत्तरे दिली आहेत, असे तिचे म्हणणे होते. “मला लिहिता-वाचता येत नाही. पण मला ऐकू येणाऱ्या आवाजांनी मला ऑर्लीयन्सचा घेराव मोडण्याचा व रिम्स येथे राजाला मुकुट चढवण्याचा आदेश दिलाय,” असे जोन ठामपणे म्हणाली होती.

जोन एक ग्रामीण मुलगी होती व चार्ल्सच्या सल्लागारांच्या प्रतिक्रियेमुळे सहज गोंधळली असती, भयभीत झाली असती. पण ती ना गोंधळली, ना भयभीत झाली. तिला पेचात पकडण्यासाठी जेव्ही कुणीतरी विचारले की तिला ऐकू येणाऱ्या आवाजाचे उच्चार कसे आहेत तेव्हा जोनने स्मित करून उत्तर दिले, “आपल्या आवाजाच्या उच्चारांपेक्षा बरे आहेत.”

जोनच्या साध्याभोळ्या श्रद्धेने धर्मोपदेशक भारावले होते. चार्ल्सच्या सल्लागारांना मात्र तिचे म्हणणे मान्य नव्हते. पण फ्रान्स अधिकाधिक संकटात गुरफटत चालला होता. त्यामुळे जोन खोटे बोलली तरी सैनिकांसाठी ती शुभसंकेत ठरू शकेल, अशी शक्यता सल्लागारांना वाटली. म्हणून ते जोनला ऑर्लीयन्सला पाठवायला राजी झाले.



फ्रेंच सैनिकांना प्रभावित करण्यासाठी जोनच्या अंगावर चिलखत चढवण्यात आले. त्यावर सफेद-शेंदरी रंगाचा झगा घालण्यात आला. तिच्यासमोर येशूचे चित्र असलेला फलक ठेवण्यात आला. या वेषात जोन दैवी वरदहस्त लाभलेली व्यक्ती दिसू लागली.

जोन ऑफ आर्कसारख्या कथा-कहाण्या काही इतर लोकांबाबतही रचल्या गेल्या आहेत. त्यांतील काही खऱ्या आहेत, काही खोट्या.

जोनबाबत एका कहाणीत तिला दिलेल्या एका घोड्याचा उल्लेख आहे. हा घोडा व्हॉकुलर्सच्या घोड्यापेक्षा जास्त उमदा होता. तो आपल्या पायांवर उभा राहिला आणि जोनला त्याने स्वार होऊ दिले नाही. “याला येशूच्या क्रुसाजवळ घेऊन चला,” तिने आदेश दिला. तसे केल्यावर घोडा गुपचुप उभा राहिला.

फ्रान्सचा नायक मार्टेल याच्या तलवारीबाबतही एक दंतकथा आहे. मार्टेलने सहा शतकांआधी मुस्लिमांच्या आक्रमणापासून फ्रान्सचा बचाव केला होता. जोनने मार्टेलची तलवार आणायला सांगितली. ही तलवार शेकडो वर्षे फेअरबिसच्या चर्चमधील एका पवित्र स्थानी लपवून ठेवलेली होती. कुणालाही त्याबद्दल काही माहित नव्हते. त्या स्थानावर खोदले तेव्हा तलवार सापडली आणि मग ती जोनकडे सोपवण्यात आली.



जोनला काही सैनिक सोबत देऊन चिनॉन व ओर्लीयन्स यांच्या दरम्यान असलेल्या ब्लोइस शहराकडे पाठवण्यात आले. तिथे तिला सहा हजार सैनिकांचे नेतृत्व देण्यात आले. चार्ल्सच्या सल्लागारांना वाटले की सैन्याचे नेतृत्व करताना ही सतरा वर्षांची शेतकऱ्याची मुलगी गर्भगळीत होईल आणि डोमरेमीला पळून जाईल.

पण जोन आपल्या भूमिकेबाबत ताठर होती. सैनिकांनी तिला पाहिले तेव्हा ते चकीत झाले. आपण तिच्या आदेशांचे पालन केले पाहिजे, हे त्यांच्या लक्षात आले. सैनिकांनी युद्धाआधी चर्चमध्ये जायला पाहिजे, हा तिचा आग्रह पाहून सैनिकांना अधिकच आश्चर्य वाटले.

गॅस्कनी भागात राहाणारा ला हिरे हा एक चांगला कमांडर व शूर माणूस होता. पण इतर सैनिकांसारखंच त्याच्या तोंडात सतत शिव्या येत असत. जोनने त्याला असे शब्द वापरणे बंद करायला सांगितले. तोसुद्धा खूप अचंबित झाला. पण त्याने जोनची आज्ञा पाळली.

इंग्रज सैनिक जोनचा तिरस्कार करत. ते तिला चेटकीण म्हणत. तिने फ्रान्सच्या राजावर जादू केली आहे, असे ते म्हणत. जोनमुळे इंग्रज सैन्य अस्वस्थ झाले होते. 1428 साली प्रत्येकाला वाटत असे की चेटकिणीकडे लोकांना इजा पोहोचवण्याची ताकद असते. शेक्सपियरने आपल्या नाटकात जोनला इंग्रज लोकांच्या दृष्टिकोनातून चितारले आहे. त्याने जोनला फ्रान्सची चेटकीण म्हटले आहे.



जोनला लिहिता-वाचता येत नव्हते. पण ब्लोइसला जाण्याआधी तिने इंग्लंडच्या राजा व सेनापतींसाठी एक पत्र लिहून घेतले. “आपल्याला ईश्वराने फ्रान्सचे रक्षण करण्यासाठी पाठवले आहे. त्यामुळे तुम्ही ताब्यात घेतलेला फ्रान्सचा सर्व भाग सोडून द्यावा,” असे तिने या पत्रात म्हटले.

जोनच्या पत्राला उत्तर आले नाही. मग जोन आपल्या सैन्याच्या प्रमुखांसोबत ऑर्लीयन्सकडे निघाली. ऑर्लीयन्सच्या सभोवती इंग्रजांनी ‘बॅस्टील्स’ नावाच्या मजबूत चौक्या बसवल्या होत्या. जोनने युक्तीने इंग्रजांची नजर चुकवून आपल्या सैन्यासह शहरात शिरण्याचे ठरवले. यामुळे तिला शहराच्या आत अडकलेले आणखी सहा हजार फ्रेंच सैनिक येऊन मिळाले असते. एवढे सैन्य इंग्रजांवर हल्ला करण्यास पुरेसे होते.

पण जोन ऑर्लीयन्सला पोहोचली तेव्हा फ्रेंच कमांडरांनी तिला धोका दिला. जोनला आपल्यापेक्षा अधिक उंचीवरील पद दिल्यामुळे ते सर्व असंतुष्ट होते. जोन अपयशी ठरावी, अशी त्यांची इच्छा होती. त्यामुळे त्यांनी तिला लाऊआर नदीच्या उत्तरेकडे असलेल्या ऑर्लीयन्सकडे नेण्याऐवजी दक्षिणेकडे नेले. तिथे उलट दिशेत वाहाणाऱ्या वाऱ्यामुळे नदीचा रुंद प्रवाह पार करणे त्यांना अशक्य झाले.

मग अचानक वाऱ्याची दिशा बदलली. जोन खरोखरच चेटकीण आहे व तिने काहीतरी चेटूक करून वाऱ्याला आपल्या दिशेने वळवून घेतले, असे इंग्रजांना वाटू लागले.



ऑर्लीयन्स शहरात अडकलेल्या भुकेल्या सैनिकांसाठी जोनने अन्न व हत्यारे सोबत घेतली. नदी पार करण्यासाठी सर्वांना पुरतील एवढ्या नावा तिथे नव्हत्या. जोनने बहुतांशी सैनिकांना पुलामार्गे नदी पार करण्यास सांगितले. तिने स्वत: नावेतून नदी पार केली. त्यावेळी लोकांनी उत्साहाने तिचा जयजयकार केला. लोकांना खात्री वाटू लागली की आता ईश्वराचा कौल त्यांच्या बाजूने आहे.

इंग्रज सैन्याने चर्चच्या घंटांचे व लोकांचे जयजयकार ऐकले तेव्हा त्यांच्या मनातील अंधश्रद्धा जागी झाली व ते घाबरले. पुढच्या दिवशी सकाळी फ्रेंच सैन्याने नदी पार केली व ऑर्लीयन्स शहरात कवायत केली. इंग्रज सैन्य या 'चेटकिणी'ला एवढे घाबरले की तिला थांबवण्याची हिंमत ते करू शकले नाहीत.

त्या काळात दोन सैन्य युद्धात समोरासमोर येऊन भिडत असत. जोनला हिंसा नको होती. दोन सैन्यांच्या दरम्यान नदी होती. तिने इंग्रज कमांडरला वेढा उठवून तिथून निघून जाण्यास सांगितले. पण त्याने तिला हास्यास्पद ठरवले. जोन निराश अवस्थेत आपल्या छावणीत परतली.

जोनला युद्धातील हिंसा पसंत नव्हती पण ती कुणाही सैनिकाइतकीच शूर होती. तिने आपली तलवार हवेत फिरवून सैनिकांना सतत प्रेरणा दिली. तिने कधी तलवार चालवल्याची लिखित नोंद नाही. तिला तलवारीची गरजच पडली नाही.



इंग्रजांना पळवून लावण्यासाठी त्यांच्या मजबूत चौक्यांवर हल्ला करणे आवश्यक होते. एकदा जोन आराम करत असताना फ्रेंच कमांडरांनी ऑगस्टाइन नावाच्या चौकीवर हल्ला केला. लढाईच्या आवाजाने जोनला जाग आली. ती तात्काळ चिलखत घालून त्या ठिकाणी पोहोचली.

या लढाईत इंग्रजांचे पारडे जड होते. फ्रेंच सैन्य मागे हटू लागले. पण जोनला तिथे आलेले पाहून फ्रेंच सैन्यामध्ये नवा जोश संचारला. ते "ईश्वराची दूत! ईश्वराची दूत!" असे ओरडत पुढे जाऊ लागले. इंग्रज सैनिक जादुटोण्याच्या भितीने पळून गेले.

दोन दिवसांनंतर जोनने आता आपल्याशी एकनिष्ठ झालेल्या सैनिकांचे नेतृत्व केले. त्यांनी टुरेल्स या आणखी एका चौकीवर हल्ला केला. आघाडीवर राहून जोनने स्वत: किल्ल्याच्या भिंतीला शिडी लावली. पण शिडीवरून चढत असतानाच एक बाण लागून तिच्या खांद्याला दुखापत झाली.

तिच्या जखमेवर मलमपट्टी करण्यासाठी तिला तिथून घेऊन जावे लागले. ती जखमी झाल्याचे बघून फ्रेंच सैनिक खचले. फ्रेंच कमांडर ड्युनॉयस आपल्या सैनिकांना मागे परतण्यास सांगणार इतक्यातच जोन तिथे परतली आणि मग त्यांनी त्या चौकीवर ताबा मिळवला.



ऑर्लीयन्सवरील इंग्रजांचा वेढा उठला. इंग्रज सैन्य निराश झाले होते. जादुटोण्याशी लढण्यात अर्थ नाही, असा विचार करून ते निघून गेले. शहरातील लोक आनंद साजरा करू लागले. चर्च लोकांनी भरून गेले. जोन स्वत: लोकांचे नेतृत्व करू लागली. लोकांनी आपल्या मुक्ततेसाठी ईश्वराचे आभार मानले.

जोनचा मत्सर करणारे फ्रान्समधील राजाचे सल्लागार व धर्मोपदेशक वगळता प्रत्येकाला विश्वास वाटू लागला की ईश्वरानेच जोनला देश वाचवण्यासाठी पाठवले होते. सैनिक तिच्यामागे कुठेही जाण्यास तयार होते. खरी गोष्ट ही होती की लढाईत इंग्रज सैन्य आपल्या पूर्ण ताकदीनिशी लढले नव्हते. तसेच एक चेटकीण फ्रेंच सैन्याचे नेतृत्व करत आहे, असा त्यांचा गैरसमज झाला. यामुळे विजयासाठी प्रयत्न न करता त्यांनी हार पत्करली.

जोन ऑफ आर्कने ऑर्लीयन्स शहराला मुक्त केले ही घटना लोक कधी विसरू शकले नाहीत. जोनची आठवण म्हणून त्यांनी तिचा पुतळा उभारला. दरवर्षी लोक तिथे मुक्तीदिन साजरा करतात.

टुरेल्सची चौकी ताब्यात घेण्याच्या घटनेचे तिथे विशेषरुपात स्मरण केले जाते. या घटनेमुळेच फ्रेंचांचा विजय निश्चित झाला. याचे स्मरण म्हणून लोकांनी लाऊआर नदीच्या डाव्या किनाऱ्यावर एक साधासा क्रुस उभारला आहे. तो किल्ल्याचे स्थान दर्शवतो.



ऑर्लीयन्सवरील विजय ही केवळ एक सुरुवात होती. फ्रान्समध्ये अद्याप हजारो इंग्रज सैनिक होते. ते फ्रेंच शहरांवर कब्जा करत होते, गावांमध्ये जाळपोळ करत होते आणि सर्वत्र नासधूस करत होते. आपल्या आवाजांचे आदेश पूर्ण करण्याआधी तसेच चार्ल्सला राजेपद देण्याआधी या इंग्रज सैनिकांना पराभूत करणे जोनला आवश्यक वाटत होते.

पूर्वी इंग्रज सैनिकांचे भय वाटणाऱ्या फ्रेंच सैनिकांना आता त्यांच्याशी लढावेसे वाटत होते. जोन त्यांच्यासोबत असल्यामुळे त्यांचे धाडस वाढले होते व त्यांना विजयाची खात्री वाटत होती.

फ्रान्सला इंग्रजांच्या ताब्यातून पूर्णपणे मुक्त करण्यासाठी जोनच्या आवाजाने एक वर्षाचा कालावधी दिला होता. त्यामुळे वेळ वाया घालवून उपयोग नव्हता. ऑर्लीयन्समधून तिने इंग्रज सैनिकांनी कब्जा केलेल्या इतर शहरांकडे मोर्चा वळवला.

ऑर्लीयन्सपासून दहा मैलांवर असलेले जॉर्जो हे शहर तिने निवडले. हे शहर इंग्रज कमांडर अर्ल ऑफ सफोल्क याच्या ताब्यात होते. पण त्याचे सैनिक ऑर्लीयन्सच्या पराभवातून अद्याप सावरले नव्हते. त्यांनी पांढऱ्या घोड्यावर स्वार होऊन आलेल्या जोनला पाहिले तेव्हा भीतीने ते अर्धमेले झाले. फ्रेंच सैनिकांनी जोनसोबत शहरातून कवायत केली व शहर ताब्यात घेतले. त्यांनी अर्ल ऑफ सफोल्कला कैद केले.



जोनने आपल्या सैनिकांना आराम करण्याची संधी दिली नाही. इंग्रज सैनिक धक्क्यातून सावरण्याआधीच तिला त्यांना नेस्तनाबूत करायचे होते. तिने पंचवीस मैल दूर असलेल्या लहान शहर ब्युजन्सीवर कब्जा केला. मग तिने उत्तरेला वीस मैलांवर असलेल्या पॅटे या शहरावर विजय मिळवला.

नकाशावर ही तीन शहरे त्रिकोण बनवतात. ऑर्लीयन्स याच्या मध्यभागी दिसते. इंग्रज सैनिकांना या त्रिकोणाच्या बाहेर हुसकून लावणे जोनला आवश्यक वाटत होते.

आतापर्यंत अंधश्रद्धेपायी घाबरून इंग्रज सैनिकांचे मनोधैर्य पूर्णपणे खचले होते. जून महिन्याच्या एके सकाळी जोन व तिचे सैनिक अचानक धुक्यातून प्रकट झाले तेव्हा त्यांनी अर्धी लढाई जिंकली होती.

चौदा वर्षांपूर्वी अजिनकोर्टच्या लढाईत इंग्रज तिरंदाजांनी मैदानात धारदार टोके असलेल्या काठ्यांची रांग उभी करून स्वत:चा बचाव केला होता. त्याच्या मागे उभे राहून त्यांनी फ्रेंच सरदारांवर प्राणघातक बाणांचा मारा केला होता. जोनने या काठ्या मैदानात रोवण्याआधीच पॅटेतील इंग्रज सैन्यावर हल्ला केला. या लढाईत एक-तृतियांश इंग्रज सैन्य मारले गेले. इतर सैन्य पळून गेले वा त्यांनी आत्मसमर्पण केले. त्यांचा कमांडर लॉर्ड टेलबट याच्यासोबत अनेक इंग्रज सरदार पकडले गेले.



रिम्सला जाण्यासाठी बरेच अंतर कापावे लागणार होते. पण तेथील इंग्रज सैनिक खूप खचले होते. ते जादूटोण्याला घाबरले होते. त्यामुळे जोनला कसलाही अटकाव न करता माघार घेऊन ते पॅरिसला गेले. जोनने आपल्या विजयी सैन्यासह ट्रॉय शहरामार्गे दोनशे मैलांचे अंतर पार केले.

रिम्समधील प्रमुख चर्चमध्ये चार्ल्सच्या राज्याभिषेकाचा भव्यदिव्य असा सोहळा पार पडला. या सोहळ्याला पारंपारिक वेशभूषेतील उच्च धर्मोपदेशक, उंची पोषाख घातलेले सरदार-उमराव आणि आकर्षक पेहरावातील स्त्रिया उपस्थित होत्या. पण सर्वांच्या नजरा खिळल्या होत्या, जोन ऑफ आर्कवर.

जोनने अंगावर चमकते चिलखत चढवले होते. फ्रान्सच्या विजयाचा फलक हातात पकडत ती राजाच्या शेजारी उभी होती. डोमरेमीच्या शेतकऱ्याच्या सतरा वर्षांच्या मुलीसाठी हा एक अद्भुत क्षण होता.

राज्याभिषेक सोहळ्यानंतर जोनला ईश्वरी आदेशाने सुरू केलेली मोहिम पूर्ण झाल्यासारखे वाटले. तिला आपले गाव लोरेन येथे परतून साधेसरळ आयुष्य जगायचे होते. “ईश्वराची इच्छा आता पूर्ण झालीय. आता मला माझ्या भावंडांसोबत पुन्हा मेंढ्या राखायला जावसं वाटतंय,” ती राजाला म्हणाली. पण हे व्हायचे नव्हते.



फ्रेंच सैन्याच्या कमांडरना जोनविषयी मत्सर वाटे. पण जोनमुळेच फ्रेंच सैन्याला ठिकठिकाणी विजय मिळाले आहेत, हे ते जाणत होते. फ्रेंच सैनिक जोनचे नेतृत्व मानत होते आणि ते तिच्या मागे कुठेही जायला तयार होते.

जोन येण्यापूर्वी मूठभर इंग्रज सैनिक शेकडो फ्रेंच सैनिकांना भारी पडत. मात्र आता परिस्थिती उलट झाली होती. जोन खूप शूर होती. तिच्या उपस्थितीत सैनिक यापूर्वी कधी लढले नसतील एवढ्या जोशाने लढले. तिच्यातील दैवी शक्तीच्या कहाण्यांमुळे फ्रेंच सैनिकांना स्फूर्ती मिळाली आणि अंधश्रद्ध इंग्रज सैनिकांच्या उरात धडकी भरली.

जोनने तिची तलवार व चिलखत रिम्स येथील सेंट डेनिस चर्चमध्ये व्हर्जीन मेरीला समर्पित केली. विजय मिळाल्यानंतर तिला ऐकू येणारे आवाज बंद झाले होते. तिने पुन्हा पुन्हा डोमरेमीला जाण्याची इच्छा व्यक्त केली. पण तिला नेहमीच थांबवण्यात आले.

जोन खूप दुःखी झाली. ती फ्रान्सची नायिका होती. सामान्य लोक तिच्यावर प्रेम करत. तिच्या आशीर्वादासाठी तिच्यासमोर गुडघे टेकून बसत. तिला पाहून कर्तव्यकठोर सैनिकांच्याही डोळ्यात अश्रू उभे राहात. पण चार्ल्स सातवा याला राजेपद देणाऱ्या जोनला त्याच्याच दरबारात मत्सर व तिरस्कारही झेलावा लागला.



पॅरिस अद्याप इंग्रजांच्याच ताब्यात होते. फ्रेंच कमांडर जाणत होते की जोनच्या नेतृत्वाशिवाय ते सैनिकांना प्रेरित करू शकणार नाहीत आणि पॅरिसवर विजय मिळवू शकणार नाहीत. जोनच्या मनाविरुद्ध त्यांनी तिला पुन्हा लढण्यासाठी तयार केले.

जड अंतःकरणाने जोनने अंगावर चिलखत चढवले. आपली मोहीम पूर्ण करण्यासाठी ईश्वराने तिला फक्त एक वर्ष दिला होता, हे तिला आठवले. ते एक वर्ष तोवर निघून गेले होते.

पॅरिसवरील हल्ला अपयशी ठरला. फ्रेंच कमांडरांचा जोनविषयी असलेला मत्सर त्यांच्या देशप्रेमापेक्षाही वरचढ ठरला. फ्रेंच सैनिक मात्र शौर्याने लढले. पण त्यांची संख्या अपुरी होती आणि इंग्रज सैन्याला सतत बाहेरून मदत मिळाली.

जोनने आपल्या सैन्याचे नेतृत्व धीरोदात्तपणे व धोक्याची तमा न बाळगता केले. जिथे जिथे लढाईने तीव्र स्वरुप धारण केले तिथे तिथे जोन गेली. सेंट ऑनोरच्या प्रवेशद्वारावरील हल्ल्यात फ्रेंच सैनिक माघार घेऊ लागले. जोन एकटीच पुढे गेली. तिने इतरांना मागोमाग येण्यास फर्मावले. पण तसे करताच जोन पुन्हा जखमी झाली. तिच्या सभोवती लढाई सुरू होती. जोन एका खंदकात पडून राहिली. प्रवेशद्वार ताब्यात घेतल्याशिवाय मैदान सोडायला तिने नकार दिला. जखमी जोनला पाहून फ्रेंच सैनिकांचा धीर खचला. फारसा प्रतिकार करू न शकणाऱ्या जोनला सोबत घेऊन ते मागे हटले.



जोनची हार झाल्यामुळे तसेच कमकुवत व भ्याड चार्ल्स बोर्जेस येथे निघून गेल्यामुळे फ्रेंच कमांडरांना मनातल्या मनात खूप आनंद झाला.

जोनने पुन्हा डोमरेमीला जाण्याची इच्छा व्यक्त केली. पण स्वार्थी राजाने पुन्हा नकार दिला. त्याऐवजी त्याने जोनला एक पदवी दिली व तिला ठराविक वेतन देण्याचे वचन दिले. हे वेतन तिला कधीच मिळाले नाही. राजाने डोमरेमी गावाला कर न भरण्याची सवलत दिली. गावाचा फायदा झाल्याचे बघून जोन खुश झाली. तरीही आपल्या गावाला परतण्याची तिची इच्छा कायम राहिली.

बर्गंडीचे सरदार इंग्रजांच्या बाजूने लढत होते. आता ते युद्धबंदी करार करायला तयार झाले. पुढच्या वर्षाच्या, साल 1430 च्या, वसंत ऋतूपर्यंत हा करार लागू झाला.

1428 साली जोनने ऑर्लीयन्स सोडले होते. तिच्या आवाजाने सांगितल्याप्रमाणे एक वर्ष कधीच उलटून गेले होते. पॅरिसच्या आग्नेय दिशेत काही मैल अंतरावर असलेल्या मेलन या ठिकाणी तिला पुन्हा आवाज ऐकू आला, “मी किल्ल्याच्या तटबंदीवर असताना सेंट कॅथरीन व सेंट मार्गारेट यांनी मला सावध केले की लवकरच मला अटक होईल. मी प्रार्थना केली की अटक झाल्यावर मला तात्काळ मृत्यू येऊ दे. कैदेत माझी दुर्दशा होऊ नये.”



1430 सालच्या मे महिन्यात जोन ऑफ आर्कच्या आवाजाने दिलेला इशारा बरोबर ठरला.

ड्यूक ऑफ बर्गंडीच्या सैनिकांनी कंपायने शहराला वेढा घातला. चार्ल्स अद्याप बोर्जेस येथेच होता. जोन फ्रेंच सैनिकांच्या एका तुकडीसोबत कंपायने येथे गेली. या हल्ल्याचे नेतृत्व करून ती नेहमीसारखेच शौर्याने लढली व शहरात दाखल झाली. ऑर्लीयन्सवरील विजयाची पुनरावृत्ती होते की काय, असे तिला पाहून वाटू लागले.

ऑर्लीयन्समध्ये जोनने शहरातील मजबूत चौक्यांवर एकामागोमाग एक हल्ले करून कब्जा केला होता. तिचे हल्ले तिथे यशस्वी ठरले. कंपायनेमध्येही तसेच डावपेच तिने आखले. तिथेही तिने अनेक हल्ले केले व बर्गंडीच्या सैनिकांना मागे हटवले. पण अचानक ते सैनिक जास्त आक्रमक झाले व फ्रेंच सैनिकांना मागे सारू लागले. यामुळे जोन एकटीच धोक्याच्या जागी अडकली. फ्रेंच सैनिकांनी शहर सोडले. जोनला शत्रुंनी घेरले व तिला घोड्यावरून खाली खेचले.

जोन आता ड्यूक ऑफ बर्गंडीची कैदी बनली. तो तिला ठार मारू शकला असता. पण या नीच फ्रेंच सरदाराने तिला इंग्रजांना दहा हजार लीवर या रकमेला विकले.



फ्रान्सच्या भ्याड राजाने शेतकऱ्याच्या या मुलीला सुटकेसाठी काहीही मदत केली नाही. याच मुलीने त्याला पुन्हा राजेपद मिळवून दिले होते, हे तो विसरला. जोनने केलेल्या अपमानाचा बदला घेण्यास इंग्रज आतुर झाले होते. त्यांनी बोव्हाइसच्या धूर्त व कपटी बिशपशी हातमिळवणी करून जोनला बर्गंडीयांकडून विकत घेतले.

इंग्रजांच्या हाती पडल्यावर आपले खूप हाल होतील, हे जोन जाणत होती. ते टाळण्यासाठी तिने साठ फूट उंचीवरील खिडकीतून खाली उडी मारली. पण त्यात ती खूप जखमी झाली. यामुळे कुणाला काही फरक पडला नाही. तिला शत्रुच्या हाती सोपवण्यात आले. कित्येक आठवडे तिला एका दमट अंधाऱ्या कोठडीत साखळदंडामध्ये जखडून ठेवण्यात आले.

त्यानंतर अन्याय्य पद्धतीने खटला चालवून जोनवर जादूटोणा करण्याचा आरोप ठेवण्यात आला. शिक्षा म्हणून तिला रोआँ येथे भर बाजारात जाळण्यात आले. ज्या चर्चने 1430 साली जोनची निंदा करून तिला हौतात्म्य दिले त्याच चर्चने 1919 साली तिला संतपद बहाल केले.

सोबतच्या चित्रातील जोन ऑफ आर्कचा पुतळा इमॅन्युएल फ्रेमायट याने तयार केला आहे. यात जोनच्या अंगावर चिलखत आहे. लढाईआधी गुडघ्यावर बसून ती ईश्वराची प्रार्थना करताना दिसते. .

**समाप्त**

